# महाराष्ट्र शासन

क्रमांक: बीयुडी-१६१९/प्र.क्र.४६/२८-अ
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ३० ऑक्टोबर, २०१९

**विषय :-** मिहान प्रकल्पाच्या विकासासाठी निधी वितरीत करण्याबाबत..

**वाचा** :-१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ८.०७.२०१९.
२. मुख्य वित्तीय अधिकारी, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी यांचे पत्र क्र.मविविकं/मिहान/९२०, दि.२४.०९.२०१९

**शासन ज्ञापन** :-

मिहान प्रकल्पाच्या विकासासाठी लेखाशिर्ष (३०५३ ०१७६) खाली निधी वितरीत करण्यात येतो. सन २०१९-२० या वित्तीय वर्षात लेखाशीर्ष ३०५३-०१७३ मधील "बाब क्र.३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान" खाली मूळ अर्थसंकल्पिय तरतूद रु.१६४.०० कोटी व पुरवणी मागणी रक्कम रु.२५०.०० कोटी अशी एकूण रु.४१४.०० कोटी तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकान्वये या निधीपैकी ६० टक्के मर्यादेत निधी वितरणास मान्यता देण्यात आलेली आहे. यापूर्वी मूळ अर्थसंकल्पिय तरतुदीतून रु.५४,६६,६७,०००/- इतकी रक्कम महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस लेखानुदान म्हणून उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे.

२. आता लेखाशिर्ष (३०५३ ०१७३) खाली मूळ अर्थसंकल्पिय रकमेच्या ६० टक्के मर्यादेत उपलब्ध रु.९८.४० कोटी तरतुदीतून उर्वरीत रु. ४३,७३,३३,०००/- निधी मिहान प्रकल्पाच्या भूसंपादन तसेच दिवाणी न्यायालयातील कलम १८ व २८ खालील दाव्यांसाठी वितरीत करण्याबाबत प्रस्ताव महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावानुसार खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे निधी महाराष्ट्र विमानतळ विमानतळ विकास कंपनीस उपलब्ध करुन देण्यासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**योजनेचे नाव- मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) (०३) मिहान प्रकल्पाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (३०५३ ०१७३) ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान**

| बाब क्र. | सन २०१९-२० ची मूळ अर्थसंकल्पिय तरतूद | मूळ अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ६० % मर्यादेत उपलब्ध तरतूद | लेखानुदान म्हणून यापूर्वी वितरीत करण्यात आलेली रक्कम | मूळ अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ६०% मर्यादेत वितरीत करावयाची उर्वरीत रक्कम |
|---|---|---|---|---|
| **३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान** | १६४,००,००,००० | ९८,४०,००,००० | ५४,६६,६७,००० | **४३,७३,३३,०००** |
| | **एकूण** | **९८,४०,००,०००** | **५४,६६,६७,०००** | **४३,७३,३३,०००** |

**( अक्षरी रक्कम रुपये त्रेचाळीस कोटी त्र्याहत्तर लाख तेहतीस हजार फक्त )**

३.	मिहान प्रकल्पासाठी आता वितरीत करण्यात येणाऱ्या रु. ४३,७३,३३,०००/- या रकमेचे वितरण पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | आता वितरीत करावयाची रक्कम (पुरवणी मागणीपैकी) |
|---|---|---|
| १. | भूसंपादन | रु.१४,२९,३३,००० |
| २. | दिवाणी न्यायालयातील वाढीव नुकसान भरपाई बाबतचे कलम १८ खालील दाखल दावे | रु. २०,००,००,००० |
| ३. | दिवाणी न्यायालयातील कलम १८ नुसार वाढीव नुकसान भरपाई मिळण्याच्या अनुषंगाने कलम २८ करीता दाखल दावे | रु. ९,४४,००,००० |
| | **एकूण** | रु.४३,७३,३३,००० |

४.	उपरोक्त खर्च " मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) (०३) मिहान प्रकल्पाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (३०५३ ०१७३) ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० करिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

५.	वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो विहीत मुदतीत खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत खर्चाचा आढावा वेळोवेळी शासनास सादर करण्यात यावा.

६.	हे शासन ज्ञापन वित्त विभागाचे परिपत्रक दि.१ एप्रिल, २०१९ तसेच दि.८ जुलै २०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत असून सदर परिपत्रकातील प्रत्येक अटीची पूर्तता करण्यात आली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

७.	सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र. २०१९१०३०१२५८०९६८०७ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

M B TASHILDAR

Digitally signed by M B TASHILDAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=9cdcc2ffd362e1bdcf8cdfa7397dfdeb590777b3b4e8650f44
dc48fd7a58093f, postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI, ou=SOIL AND WATER
CONSERVATION DEPARTMENT, o=GOVERNEMENT OF
MAHARASHTRA, cn=M B TASHILDAR
Date: 2019.10.30 15:09:16 +05'30'

**( मो. बा. ताशिलदार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
२. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई

३. महालेखापाल, ( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
६. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती.